एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (सीपीटीपी-३) अंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्या उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी,गट-अ यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन आदेश क्रमांक - टिआरएन-२०१९/प्र.क्र.१५/सीपीटीपी-अ

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक-१६.१२.२०२१.

वाचा :- १.सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१८-ब, दि.२०/०१/२०१४

२.सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र.टिआरएन-०४१६/ प्र.क्र.६१/१६/ १८-ब, दि.०४/०६/२०१६

३.सा.प्र.वि.,कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-२०१७ /प्र.क्र.३१ /सीपीटीपी-अ, दि.४/१२/२०१७

५.सा.प्र.वि.,शासन निर्णय, क्र. परिवी-२७१५ /प्र.क्र.३०२/ आठ, दि.२९/०२/२०१६

## शासन आदेश

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१५ अन्वये शिफारस झालेल्या व दिनांक ०४/०६/२०१६ च्या कार्यालयीन आदेशान्वये परिविक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी (गट- अ) या पदावर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (सीपीटीपी-३(२०१६)) दिनांक ०२/०५/२०१६ ते दिनांक ३०/०४/२०१८ या कालावधीत पूर्ण झाला असून सदर प्रशिक्षण खालील विवरणपत्रातील श्री. उंदिरवाडे यांनी समाधानकारकरित्या पूर्ण केले आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक २९ फेब्रुवारी,२०१६ मधील तरतूद क्रमांक १ (३) (ब) नुसार परिविक्षा कालावधीत नैमित्तीक रजेव्यतिरिक्त कोणत्याही स्वरूपाची रजा उपभोगल्यास उमेदवारांचा परिविक्षा कालावधी रजेच्या कालावधीएवढा वाढविण्यात येतो. त्यानुसार श्री. उंदिरवाडे यांचा स्तंभ क्र. ५ मध्ये नमूद रजा कालावधीएवढा परिविक्षा कालावधी वाढविण्यात येत असून स्तंभ क्र. ७ मध्ये नमूद केलेल्या दिनांकास परिविक्षा कालावधी समाप्त करण्यात येत आहे.

**(प्रशिक्षण कालावधी दिनांक ०२/०५/२०१६ ते दिनांक ३०/०४/२०१८)**

| अ.क्र. | नाव | शिफारस प्रवर्ग | परिविक्षाधीन म्हणून सेवेत नियुक्तीचा दिनांक | उमेदवाराने उपभोगलेल्या रजा (दिवस) | विभागीय परीक्षा उत्तीर्ण/परीक्षेचा कालावधी | परिविक्षा कालावधी समाप्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. कुणाल रुपचंद उंदिरवाडे | SC | ०२/०५/२०१६ (म.पू.) | ८८+४३ | विभागीय परीक्षा प्रथम संधीत उत्तीर्ण | ०८/०९/२०१८ (म.नं.) |

३. शासन निर्णय, दि. २९/०२/२०१६ मधील परिच्छेद १ (८) मध्ये पुढील तरतूद आहे :- “परिविक्षा अधिकारी यांस पहिली वेतनवाढ, त्यांचा एक वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यावर देण्यात यावी व त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यावर देण्यात यावी”. त्यानुसार श्री. उंदिरवाडे, यांना पहिली वेतनवाढ दिनांक ०४/१२/२०१७ च्या कार्यालयीन आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली आहे. आता त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने त्यानंतरची वेतनवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त **"परिच्छेद २"** मधील तक्त्यातील श्री. उंदिरवाडे यांनी परिविक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी, गट-अ या पदावरील परिविक्षा कालावधी पूर्ण करण्यासाठी विहित केलेल्या निकषांची / अटींची पूर्तता केली असल्यामुळे सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२१६१०२२४८७९०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gupte Sanju Kamlakar

Digitally signed by Gupte Sanju Kamlakar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2834863d93dd5ba34736e8845b6287c3dd58ee176cf2b893df4e169e70699c59, serialNumber=4c10e808fe85223e03be4cad0148cef9a71914878680c586fc438e7239dafca4, cn=Gupte Sanju Kamlakar
Date: 2021.12.16 12:36:41 +05'30'

**( संजू गुप्ते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती**

श्री. कुणाल रुपचंद उंदिरवाडे, उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी (गट- अ) (ईमेलद्वारे)

**प्रत,**

१. सह सचिव/ उप सचिव, (आस्था- उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी, गट-अ), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
४. निवडनस्ती